**उपसंचालक, आरोग्य सेवा, लातूर मंडळाच्या अधिपत्याखालील उपजिल्हा रुग्णालय, केज, जि.बीड येथील ६० अस्थाई पदे पुढे चालु ठेवण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन

## सार्वजनिक आरोग्य विभाग

**शासन निर्णय क्रमांकः अपदे-२०१८/प्र.क्र.८३/आरोग्य-४**

१० वा मजला, संकुल इमारत,
गो.ते. रुग्णालय आवार, मुंबई-४०० ००१.
तारीख: १ नोव्हेंबर, २०१८.

वाचा

१) **सहसंचालक, आरोग्य सेवा, रूग्णालये (राज्यस्तर), मुंबई यांचे पत्र, क्र.संआसे/कक्ष-३/टे-५अ/२०१८-१९/लातुर/अपदे/२२५२-५३/१८, दि.०३.०३.२०१७.**
२) **शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांकः अपदे-२०१८/प्र.क्र.८३/आरोग्य-४, दि.२०.०४.२०१८.**
३) **शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांकः पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.०७.०९.२०१८.**

शासन निर्णय

उपसंचालक, आरोग्य सेवा, लातूर मंडळाच्या अधिपत्याखालील उपजिल्हा रुग्णालय, केज, जि.बीड येथील ६० अस्थाई पदांना संदर्भाधीन क्रमांक २ येथील दि.२०.०४.२०१८ च्या शासन निर्णयान्वये दि.१.०३.२०१८ ते दि.३०.०९.२०१८ या कालावधीकरीता मुदतवाढ देण्यात आली होती.

२. या शासन निर्णयान्वये उपसंचालक, आरोग्य सेवा, लातूर मंडळाच्या अधिपत्याखालील संदर्भाधीन अनुक्रमांक २ येथील शासन निर्णयासोबतच्या विवरणपत्र “अ” मधील उपजिल्हा रुग्णालय, केज, जि.बीड येथील ६० अस्थाई पदांना खालील अटींच्या अधीन राहून दि.१.१०.२०१८ ते दि.२८.०२.२०१९ या कालावधीसाठी मुदतवाढ देण्यात येत आहे.

१) उपरोक्त पदांपैकी कोणतेही पद ६ महिन्यापेक्षा जास्त काळ रिक्त नाही व ज्या कारणांसाठी पदे मंजूर केली आहेत त्या अटी व शर्तीचे पालन करण्यात आले आहे.
२) शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक-पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.०७.०९.२०१८ नुसार विहित करण्यात आलेल्या अटी व शर्तीचे कटाक्षाने पालन करण्यात यावे व त्याप्रमाणे कार्यवाही करण्यात यावी. त्याचप्रमाणे कार्यालयाचा पदविषयक सुधारित आकृतिबंध उच्चस्तरीय समितीकडून अंतिमत: मान्य करुन घेण्याबाबत तात्काळ कार्यवाही करण्यात यावी.
३) विहीत मुदतीत पदांच्या आढाव्याची कार्यवाही पूर्ण न झाल्यास अस्थायी पदांना त्या पुढील कालावधीसाठी मुदतवाढ न मिळाल्यास व त्यामुळे अधिकारी / कर्मचारी यांच्या वेतन व भत्ताचा प्रश्न निर्माण झाल्यास त्याची जबाबदारी संचालक, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई यांची राहील.

सदर पदांवरील होणारा खर्च, मागणी क्रमांक आर-१ मधील मुख्य लेखाशीर्ष “२२१०-वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य, ०१-नागरी आरोग्य सेवा व विषम चिकित्सा, ११०- रुग्णालये व दवाखाने, ११०-७- पंचवार्षिक

योजनांतर्गत योजना- राज्य योजनांतर्गत योजना, (०६)(०१)- मुफसल क्षेत्रातील अध्यापनेत्तर शासकीय रुग्णालये व दवाखाने (२२१० ०२२६)” या लेखाशिर्षाखाली सन २०१८-१९ या आर्थिक वर्षाकरीता मंजुर झालेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

४. सदर शासन निर्णय, वित्त विभागाचा शासन निर्णय क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.०७.०९.२०१८ अन्वये प्रशासकीय विभाग प्रमुखांना प्रदान केलेल्या अधिकारात निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१०३११७३४४३६०१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Pradip M Balkavde

Digitally signed by Pradip M Balkavde
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Health Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8db6aab31faca2f1a89698a28c94703436c07cda664672d20607766dc59d345b, serialNumber=ed0fa40788bb5c0d7f76b869fa2e5835af215c6a80eae8f70eaf87b0cf68d63f, cn=Pradip M Balkavde
Date: 2018.11.01 11:37:05 +05'30'

**(प्र.मो.बलकवडे)**
अवर सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग,
महाराष्ट्र शासन

प्रत,

१. महालेखापाल, १/२,महाराष्ट्र (लेखा व लेखा परिक्षा) (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/ नागपूर.
२. आयुक्त, आरोग्य सेवा तथा संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई
३. संचालक, आरोग्य सेवा, मुंबई
४. सहसंचालक, आरोग्य सेवा ( रूग्णालये-राज्यस्तर ), मुंबई.
५. सहसंचालक, आरोग्य सेवा ( अर्थ व प्रशासन ), पुणे.
६. सहाय्यक संचालक, आरोग्य सेवा ( लेखा व लेखापरिक्षा ), पुणे.
७. उपसंचालक, आरोग्य सेवा, लातूर मंडळ, लातूर.
८. जिल्हा शल्य चिकित्सक, उस्मानाबाद/लातूर/बीड/नांदेड
९. जिल्हा कोषागार अधिकारी, उस्मानाबाद/लातूर/बीड/नांदेड
१०. जिल्हा आरोग्य अधिकारी, उस्मानाबाद/लातूर/बीड/नांदेड
११. वित्त विभाग (व्यय-१३, अर्थसंकल्प-१९ ), मंत्रालय, मुंबई.
१२. अवर सचिव ( सेवा-२/ सेवा-३/ सेवा-५ /अर्थसंकल्प), सा.आ.वि., मंत्रालय, मुंबई.
१३. निवडनस्ती ( आरोग्य- ४ ).